नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी व कार्यशाळा बांधण्यास प्रशासकीय मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-३५२०/१/प्र.क्र.३२/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक.- ३१ मे २०००.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/३२९४/३२११/कक्ष-३ दिनांक ४.२.२०००.
२) क्रिमिनल रिट पिटीशन क्र.२८५/९९ उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ नागपूर, बंदी सखाराम जायभाय विरुध्द महाराष्ट्र शासन.

**शासन निर्णय:-** नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी व कार्यशाळा बांधण्यास शासनाने प्रशासकीय मान्यता द्यावी अशी कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास विनंती केली आहे. कारागृह महानिरीक्षक यांनी प्रस्तावित बांधकामाचा नकाशा व रु.५६,९५,२००/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक शासनास मान्यतेसाठी सादर केले आहे. त्यांनी शासनाच्या असेही निदर्शनास आणले आहे की, नागपूर मध्यवर्ती कारागृहामध्ये त्याच्या क्षमतेपेक्षा अधिक बंद्यांना ठेवले जाते. त्यामुळे बंद्यांना थोडयाशा जागेत रहावे लागते व त्यांची अडचण होते. या व इतर कारणामुळे नागपूर मध्यवर्ती कारागृह येथील बंदी सखाराम जायभाय याने क्रिमिनल रिट पिटीशन क्र.२८५/९९ उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ,नागपूर येथे दाखल केले आहे व प्रकरण न्यायप्रविष्ट झाल्यामुळे यास प्रशासकीय मान्यता तात्काळ द्यावी अशी शासनास विनंती केली आहे.

२. कारागृह महानिरीक्षक याचा नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी व कार्यशाळा बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव कांही काळ शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार केला असून विचाराअंती शासन या शासन निर्णयाद्वारे नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी व कार्यशाळा बांधण्यासाठी येणारा खर्च रु.५६,९५,२००/-(रुपये छप्पन्न लाख पंच्याण्णव हजार दोनशे) यास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) शासनाने यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली प्रकरणे प्रथम प्राधान्याने हाताळावीत व नंतरच या कामास सुरुवात करण्यांत यावी.
२) सदर कामासाठी प्रस्तावित करण्यांत आलेल्या अनुदानाची तरतूद प्रत्यक्ष अर्थसंकल्पात झाल्याशिवाय सदर कामास सुरुवात करु नये.
३) तरतूद केलेल्या अनुदानातूनच प्रस्तावित बांधकामाचा खर्च भागविण्यात यावा. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.
४) प्रस्तावित बांधकामास येणाऱ्या खर्चाच्या ५०% रक्कम केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून अनुदान खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष -"४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, तुरुंग" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व पुरवणी मागणीद्वारे आर्थिक वर्ष २०००-२००१ या वित्तीय वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

..२.

४. ह्या शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,नियोजन विभाग व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-१७७७/व्यय-८, दिनांक २२.५.२००० च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रि.ई.शेख )

**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

प्रति,

कारागृह महानिरीक्षक , महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, मध्यवर्ती कारागृह,नागपूर.

अधिक्षक,नागपूर मध्यवर्ती कारागृह.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.

महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.

महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.

महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा),नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.

नियोजन विभाग (का.१४७५) मंत्रालय,मुंबई.

सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा.२) मंत्रालय,मुंबई.

अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई.

निवडनस्ती.